**ॲड.कौशिक मदन म्हात्रे, विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**मालवणी पोलीस ठाणे गु.र.क्र. ३९३/२०२३ अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवलेल्या न्यायालयीन कामकाजा करीता.**



**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-०९२३/प्र.क्र.१७१/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: ०८.०५.२०२४.

**संदर्भ :-** १.पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र जा.क्र.पोआ/वा./परि-११/वि.स.अ./३७३४/२०२३, दि.११.०४.२०२३.
२.शासन अधिसुचना, विधि व न्याय विभाग, क्र. एसपीपी २०२३/यु.ओ.आर.९९/ डी-१४ दि.१०.०१.२०२४.
३.शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. २९.०७.२०१५.
४.शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. १६.०६.२०१७.

**शासन निर्णय :-**

मालवणी पोलीस ठाणे गु.र.क्र. ३९३/२०२३ अन्वये दाखल गुन्ह्यातून उद्भवलेल्या न्यायालयीन प्रकरणात मा.अति.महानगर दंडाधिकारी २४ वे न्यायालय, बोरीवली, मा.सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई व मा.उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयांमध्ये शासनाची बाजू मांडण्यासाठी विधि व न्याय विभागाने संदर्भाधीन क्र.२ येथील दि.१०.०१.२०२४ च्या अधिसूचना अन्वये ॲड.कौशिक मदन म्हात्रे यांची विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती केलेली आहे.

२. उक्त न्यायालयीन प्रकरणी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून काम पाहण्यासाठी ॲड.कौशीक मदन म्हात्रे यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | न्यायालयाचे नाव | प्रतिदिन परिणामकारक सुनावणी करीता व्यावसायिक फी |
|---|---|---|
| १ | १.मा.अति.महानगर दंडाधिकारी २४ वे न्यायालय, बोरीवली.<br>२. मा.सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई. | रु.१०,०००/-<br>अक्षरी रुपये दहा हजार फक्त. |
| २ | १. मा.उच्च न्यायालय, मुंबई. | रु.२०,०००/-<br>अक्षरी रुपये वीस हजार फक्त. |

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड.कौशीक मदन म्हात्रे यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

३. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करून घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त यांनी घ्यावी.

४. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८-व्यावसायिक सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

५. प्रस्तुत शासन निर्णय संदर्भ क्र. २ व ३ मधील वित्त विभाग शासन निर्णयानुसार मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायालयीन प्रकरणी नेमण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना फी अदा करण्यासंदर्भात प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

६. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.०३/२०२३/व्यय-७, दि.०४/०१/२०२३ अन्वये प्राप्त शासन मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५१५११२१४०१५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HARESHWAR NAMDEO SAHANE

Digitally signed by HARESHWAR NAMDEO SAHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=c666d6034b5e98c5d1bd37af6d50b3277469ad6a9c55fe42051469194c47c2d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A0C4666E299E972427F9DABEDD7FF52FB5313B50C0D9A59C64EC908916651EC1, cn=HARESHWAR NAMDEO SAHANE
Date: 2024.05.15 11:34:17 +05'30'

**(हरेश्वर सहाणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई-०१.
२. पोलीस उप आयुक्त, परिमंडळ ११, मुंबई.
३. वरिष्ठ पोलीस निरीक्षक, मालवणी पोलीस ठाणे, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७. ॲड. कौशिक म्हात्रे, ऑफिस क्र.४०९६, २ रा मजला, रुस्तुमजी इ झोन मॉल, गोरेगांव-मुलुंड लिंक रोड, मलाड (प.) मुंबई-४०००६४.
८. विधी व न्याय विभाग (कार्यासन -१४), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).